GR·200404101602460001-0100

प्रकल्पग्रस्त व्यक्तींना शासकीय सेवेत गट-ड च्या पदांवर नियुक्तीसाठी वयोमर्यादेत सूट देण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : एईएम-1099/प्र.क्र.47/99/16-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 24.2.2000.

संदर्भ:- 1) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-1078/पीएपी/12, दि.22.9.78.
2) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एईएम-1080/35/16-अ, दि. 21 जानेवारी, 1980.

## शासन निर्णय

प्रकल्पग्रस्त व्यक्ती व त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना बृहन्मुंबई बाहेरील शासकीय कार्यालयातील गट 'क' आणि गट 'ड' मधील पदांवर शासकीय सेवा भरतीसाठी असलेली कमाल वयोमर्यादा 3 वर्षांनी शिथिल करण्यात आली आहे. त्यामुळे बृहन्मुंबईतील गट 'क' व गट 'ड' च्या पदांवर प्रकल्पग्रस्त व्यक्ती व त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना वयोमर्यादेत तीन वर्षांची सवलत अनुज्ञेय नव्हती.

2. शासनाने विकासासाठी हाती घेतलेल्या विविध प्रकल्पासाठी जमीनधारक आपली जमीन, घर इत्यादी स्थावर मालमत्ता शासन स्वाधीन करुन कुटुंबासह अन्यत्र स्थलांतरित होतो. त्यामुळे या प्रकल्पग्रस्तांना पुन्हा नवीन जीवनक्रम सुरु करावा लागतो. बृहन्मुंबईतील गट-क मधील बहुतांश पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे असून, गट-ड मधील पदे पूर्णतः नियुक्ती प्राधिका-यांचे कक्षेतील पदे आहेत. प्रकल्पग्रस्तांना सेवाविषयक सवलती देण्याच्या शासनाच्या धोरणाचा आशय व उद्देश लक्षात घेता असा निर्णय घेण्यात येत आहे की, **प्रकल्पग्रस्त वा त्यांच्यावर अवलंबून असणा-या व्यक्तींना गट-ड च्या पदांवर नियुक्ती देताना संदर्भाधिन क्र.1 च्या आदेशातील 'Situated outside Greater Bombay' हा मजकूर तसेच संदर्भाधिन क्र.2 च्या आदेशातील 'बृहन्मुंबई बाहेरील' हा मजकूर वगळण्यात यावा. गट-क च्या पदावर नियुक्ती देताना दि.22/9/78 व 21/1/80 च्या आदेशाप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शैला तारगे पाटील,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

1. राज्यपाल यांचे सचिव,
2. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
3. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
4. सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
5. शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* 6. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* 7. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* 8. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* 9. प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकायुक्त, मुंबई,
* 10. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* 11. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
* 12. सचिव, राज्य निवडणूक आयोग,
13. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-1, मुंबई,
14. महालेखापाल, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-1, मुंबई,
15. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-2, नागपूर,
16. महालेखापाल, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-2, नागपूर,
17. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
18. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
19. सर्व विभागीय आयुक्त,
20. सर्व जिल्हाधिकारी/जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
21. राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
22. मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
23. सर्व मंत्रालयीन विभाग,
24. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
25. निवड नस्ती.

* पत्राने.